*नेहरू बाल पुस्तकालय*

# सुट्टी?... नको रे बाबा!




**जसविंदर कौर बिंद्रा**

रेखाचित्रे

**अमृता रॉय**

अनुवाद

**सुवर्णगौरी चव्हाण**

nbt.india
एकः सूते सकलम्

**नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया**

**नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया**ची स्थापना पुस्तकांचा प्रचार आणि वाचन अभिरुचीचा विकास या उद्देशाने सन 1957 मध्ये भारत सरकारच्या (उच्च शिक्षण विभाग, मनुष्य संसाधन विकास मंत्रालय) द्वारा केली गेली आहे. लहान मुलांच्या पुस्तकांच्या प्रकाशनास संस्थेतर्फे नेहमीच प्राथमिकता दिली जाते. भारतातील वेगवेगळ्या वयोगटांतील मुलांसाठी प्रथितयश बहुभाषिक बाल-वाङ्मय प्रकाशन असलेल्या ट्रस्टने आतापर्यंत इंग्रजीसहित 30 पेक्षा अधिक भाषा आणि बोलींमधील रंगीत आणि सचित्र पुस्तके मुलांना त्यांच्या मातृभाषेतून उपलब्ध करून दिली आहेत. बाल आणि कुमारवयीन मुलांसाठी असलेली ही सर्व पुस्तके नेहरू बाल पुस्तकालय ह्या मालिकेद्वारा प्रकाशित केली जातात.



ISBN 978-81-237-9020-6

प्रथम प्रकाशन : 2019 (*शके* 1941)



Chutti Na Bhai Na . . . *(Hindi Original)*
Sutti... Nako Re Baba . . . *(Marathi)*

**₹ 40.00**

संचालक, नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया
नेहरू भवन, 5 इन्स्टिट्युशनल एरिया, फेज-II
वसंत कुंज, नवी दिल्ली-110 070 यांनी प्रकाशित केले.

www.nbtindia.gov.in



आकाशातील तळपत्या सूर्याच्या मनात विचार आला, ‘प्रत्येक जण सुट्टीची मजा घेत असतो, दिवस आणि रात्रसुद्धा आळीपाळीने सुट्टी घेत असतात. चंद्र आणि चांदण्यादेखील ढग आले की सुट्टी घेतात, पण मला मात्र कधीच सुट्टी नसते. मलापण सुट्टीचा अधिकार आहेच की!’



आणि सूर्याने सुट्टी घेण्याचे ठरवत आकाशातून दडी मारली. सगळीकडे अचानक काळोख पसरला, शेतकऱ्यांना शेतात काम करणं अवघड होऊन गेलं, आणि हे अचानक काय आक्रीत घडलं? असा सगळ्यांना प्रश्न पडला.



पिल्लांकरता चारा शोधणारे पक्षी वाट चुकले आणि एकदम झालेल्या अंधाराने गोंधळले. चारा शोधण्याऐवजी ते आपल्या घरट्याकडे परतण्यासाठी धडपडू लागले आणि त्यामुळे पिल्लांना उपाशी राहावे लागले.



सूर्याच्या अशा अचानक नाहीसे होण्याने पर्वत-शिखरांवरील बर्फ वितळणे थांबल्याने जीवनदायिनी नद्यांना पाणी मिळणे बंद झाले आणि रोपांना सूर्यप्रकाश न मिळाल्याने त्यांनीदेखील मान टाकली.










एके ठिकाणी अंतिम टप्प्यात असलेला क्रिकेटचा सामना कोण जिंकतय याची उत्सुकता शिगेला पोहोचलेली असतानाच अचानक झालेल्या अंधाराने तिथे जमलेल्या लाखो क्रीडारसिकांनी गोंधळ घालण्यास सुरुवात केली.





सगळ्यांना होणारा त्रास आणि सर्वत्र माजलेला गोंधळ सूर्य आकाशातून बघत होता. त्याच्याशिवाय संपूर्ण सृष्टी जणू गोठून गेली आणि निसर्गचक्र थंडावले. सूर्याच्या मनात आले की अशा सुट्टीचा काय उपयोग जिच्यामुळे संपूर्ण जगाचा विनाश ओढवला आहे?



सूर्याचे मन द्रवले, डोळ्यांच्या पापण्या ओलावल्या आणि त्याने सुट्टीचा विचार रद्द करून पुन्हा कामावर रुजू होण्याचे ठरवले! आणि आकाशात पुन्हा एकदा सूर्य पूर्वीपेक्षा अधिक तेजाने तळपू लागला. त्याने पुन्हा एकवार पृथ्वीवर डोकावून बघितले असता सृष्टीचे सर्व कार्य सुरळीत झाल्याचे दिसल्याने त्याचे मन सुखावले!



सूर्याच्या मनात आनंदाची लहर पसरली. त्याने आपलेच कान पकडले आणि, ''सुट्टी? नको रे बाबा! कधीच नको!'' असे म्हटले.



Lasertypeset by Mac Script, Pune-411007 and printed at India Offset Press, New Delhi



# सुट्टी? . . . नको रे बाबा!

जसविंदर कौर बिंद्रा

रेखाचित्रे

अमृता रॉय

अनुवाद

सुवर्णगौरी चव्हाण